## . . श्री लक्ष्मीची आरती . .

दितिजा दितिजे यज्ञे पयसागर मायिला
सिंधु प्रसवे तेरा रत्ने सहित्य तुला
त्यजुनि सुरासुर मानव ऋषिमंडल सकला
श्रीविष्णूच्या कंठी घालिसि तू माला ...1

जय जय लक्ष्मी फल सुख फल तव भजनाते
पीडा निरसुनि रक्षण करि सर्वजनाते ...धृ0

तत्पदि पुंडरिकास्तव पंढरपुरी राहे
सत्सन्निध रक्षांगी वससी तू माये
सन्मुख कान्होपात्रा हेमाश्वत्थाहे
त्वत्पूजकाकडे कधि काळ न पाहे ...जय जय लक्ष्मी...2

द्यावे सर्व जनाला सौख्य जगन्माते
निर्दाळावे जननी सर्वारिष्टाने
तू मातोश्री तुजविण प्रार्थू कवणाते
करूणा करिते श्रीहरि कान्ते सिंधुसुते ...जय जय लक्ष्मी...3

निज भक्ताला आयुष्य धेनु धन धान्य
स्त्री पुत्र पौत्र देऊनि करिसी जगमान्य
शिबिका वरण हयरय देशिल सन्मान्य
दातृत्व तुझे तुज सम कोण असे अन्य ... जय जय लक्ष्मी...4

सर्वहि दुःखे शक्ती शमती त्वन्नाभस्मरणे
यास्तव विधिरह सूरवर पूजिति सन्माने
तुझिया मंडपि होति द्विज भोजन भजने
यशवन्तात्मज भावे त्वत्पदि करि नमने ... जय जय लक्ष्मी...5

## . . श्री लक्ष्मी स्तुति . .

महालक्ष्मी नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं सुरेश्वरि
हरिप्रिये नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं दयानिधे